खाजगी विना अनुदानित व कायम विना अनुदानित शिक्षण संस्थांमधील व्यावसायिक अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेणा-या आर्थिकदृष्टया मागासवर्गीय विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक शुल्काच्या प्रतिपूर्तीबाबत

# महाराष्ट्र शासन

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१२/प्र.क्र.१६७/७ अे**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक :- ३० /०६/२०१५**

**वाचाः**

१) कृषि व प.दु.म. विभाग, शासन निर्णय क्रमांक अेजीयु १००५/प्र.क्र.२२५/७ अे दि.१५.०५.२००७
२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक टीईएम २००६/(३५३/०६) तांशि-१ दि.२१.०३.२००७
३) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक टीईएम २००६/(४२९/०७) तांशि-१ दि.२.११.२००७
४) कृषि व प.दु.म. विभाग, शासन निर्णय क्रमांक अेजीयु १००८/प्र.क्र.७/७ अे दिनांक १.०३.२००८
५) कृषि व प.दु.म. विभाग, शासन निर्णय क्रमांक अेजीयु १००८/प्र.क्र.७/७ अे दिनांक २२.०९.२००८
६) कृषि व प.दु.म. विभाग, शासन निर्णय क्रमांक अेजीयु १००८/प्र.क्र.७/७ अे दिनांक २१.०८.२००८
७) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक टीईएम २०१०/ (१२५/२०१०)तांशि-४ दि.६.११.२०१०
८) कृषि व प.दु.म. विभाग, शासन निर्णय क्रमांक अेजीयु १००८/प्र.क्र.७/७ अे दिनांक २३.०२.२०११
९) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक टीईएम २०११/(५३/११) तांशि-४ दि.८.११.२०११
१०) कृषि व प.दु.म. विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण २०१२/प्र.क्र.१४/७ अे दिनांक १४.०३.२०१२
११) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक टीईएम २०१२/प्र.क्र.५३(२)/तांशि-४ दि.११.१०.२०१२
१२) कृषि व प.दु.म. विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण २०१२/प्र.क्र.१६७/७ अे दिनांक ३०.०७.२०१३
१३) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक टीईएम २०१३/प्र.क्र.१९२/तांशि-४ दि.३.०३.२०१४
१४) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,शासन निर्णय क्र.इबीसी २०१४/प्र.क्र.४०/शिक्षण १ दि.८.०७.२०१४
१५) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक टीईएम २०१४/प्र.क्र.९०/तांशि-४ दि.२०.०३.२०१५

**प्रस्तावनाः**

शासनाच्या उच्च व तंत्र शिक्षण विभाग, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग तसेच कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग या विभागांच्या अधिपत्याखाली असणा-या अभ्यासक्रमांमध्ये खाजगी विना अनुदानित व कायम विनाअनुदानित शिक्षण संस्थांमधील व्यावसायिक अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेणा-या सामाजिक मागास व आर्थिकदृष्टया दुर्बल घटकांतील विद्यार्थी केवळ निधीअभावी व्यावसायिक अभ्यासक्रमांपासून वंचित राहू नये म्हणून एक सामाजिक बांधिलकी व घटनात्मक उत्तरदायित्व म्हणून राज्य शासनाने फी प्रतिपूर्ती करण्याबाबतचा धोरणात्मक निर्णय शैक्षणिक वर्ष २००६-०७ पासून घेतलेला आहे. सदरहू निर्णय शैक्षणिक वर्ष २००७-०८,२००८-०९,२००९-१०,२०१०-११ ,२०११-१२, २०१२-१३, २०१३-१४ मध्ये कायम ठेवण्यात आलेला आहे. आता सदरहू योजना शैक्षणिक वर्ष २०१४-१५ मध्ये आहे त्याच स्वरुपात सुरु ठेवण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. या निर्णयानुसार अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्ग व इतर मागास वर्ग या समाज घटकांतील विद्यार्थ्यांची फी प्रतिपूर्ती करण्याबाबतचे आदेश सामाजिक न्याय विभागामार्फत आणि अनुसूचित जमाती

या घटकातील विद्यार्थ्यांसाठी फी प्रतिपूर्ती करण्याबाबतचे आदेश आदिवासी विकास विभागाकडून तसेच आर्थिक दुर्बल घटकातील विद्यार्थ्यांच्या प्रतिपूर्ती करण्याबाबतचे आदेश त्या त्या प्रशासकीय विभागांमार्फत निर्गमित करणे अपेक्षित आहे. त्या अनुषंगाने कृषि व प.दु.म. विभागाच्या अधिपत्याखालील व्यावसायिक अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेणा-या आर्थिक दुर्बल घटकांतील विद्यार्थ्यांची शिक्षण शुल्क प्रतिपूर्तीची योजना शैक्षणिक वर्ष २०१४-१५ मध्ये आहे त्याच स्वरुपात सुरु ठेवण्याची बाब या विभागाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णयः**

राज्यातील कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागांतर्गत व्यावसायिक अभ्यासक्रमांच्या खाजगी विना अनुदानित व कायम विना अनुदानित महाविद्यालयात प्रवेश घेतलेल्या आर्थिकदृष्टया मागासवर्गीय विद्यार्थ्यांसाठी सुरु असलेली शिक्षण शुल्क प्रतिपूर्तीची योजना शैक्षणिक वर्ष २०१४-१५ या वर्षासाठी आहे त्याच स्वरुपात राबविण्यासाठी खालील अटींच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१) खाजगी विना अनुदानित व कायम विना अनुदानित शिक्षण संस्थांमध्ये महाविद्यालयाच्या कृषि व संलग्न विषयातील (पदविका/पदवी/पदव्युत्तर पदवी)अभ्यासक्रमांसाठी व्यवस्थापन कोट्यातील प्रवेश वगळून इतर जागांवर प्रवेश घेणा-या विद्यार्थ्यांना सदर सवलत लागू राहील.

२) सदरहू योजनेचा लाभ घेण्यासाठी आर्थिक दुर्बल घटकांतील विद्यार्थ्यांच्या पालकांचे वार्षिक आर्थिक उत्पन्न रु.१.०० लक्ष रकमेच्या आत असणे आवश्यक राहील.

३) आर्थिक दुर्बल घटकांतील विद्यार्थ्यांना ५० टक्के शिक्षण शुल्काची प्रतिपूर्ती शासनामार्फत करण्यात येईल.

४) सदरहू योजनेचा लाभ शैक्षणिक वर्ष २००६-०७, २००७-०८, २००८-०९, २००९-१०,२०१०-११ ,२०११- १२, २०१२-१३ व २०१३-१४ मध्ये प्रवेशित विद्यार्थ्यांना अभ्यासक्रमांच्या पूर्ण कालावधीपर्यंत लागू राहील.

५) अभिमत विद्यापीठांना ही सवलत लागू राहणार नाही.

६) अनुत्तीर्ण विद्यार्थ्यांना ही सवलत लागू राहणार नाही.

७) शैक्षणिक शुल्काची प्रतिपूर्तीचे सदर धोरण हे सन २०१४-१५ या शैक्षणिक वर्षाकरिता लागू राहील.

८) आर्थिक मागास प्रवर्गाचे प्रमाणपत्र हे संबंधित तहसिलदार यांचे असावे.

९) आर्थिकदृष्टया मागासवर्गीय विद्यार्थ्यांबाबत सदर योजना चालू ठेवण्यासाठी या विभागाकडून आवश्यक रकमेची तरतूद करण्यात येईल.

१०) सदर योजनेचा खर्च- " मागणी क्र.डी-३,
२४१५- कृषिविषयक संशोधन व शिक्षण,
०१-पीक संवर्धन,
१२०- इतर संस्थांना सहाय्य
(००)(०५)-महाराष्ट्र कृषिविषयक शिक्षण व संशोधन परिषदेला सहायक अनुदान
३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) दत्तमत (२४१५००६१)"

या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

२. सदर शासन निर्णय कुलसचिव, कृषि विद्यापीठे राहुरी/ दापोली/परभणी/ अकोला यांनी आपल्या कार्यक्षेत्रातील सर्व कृषि महाविद्यालय/ कृषि तंत्र विद्यालयाचे प्राचार्यांच्या निदर्शनास आणावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१२८/ २०१५/ व्यय-१, दि.२.६.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६३०११५७१३०८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kamlakar Yeshvant Vanjare

Digitally signed by Kamlakar Yeshvant Vanjare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture and ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kamlakar Yeshvant Vanjare
Date: 2015.06.30 12:02:26 +05'30'

**(क.य.वंजारे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) मा. राज्यपाल-नि-कुलपती यांचे सचिव,राजभवन,मलबार हिल,मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३) मा. मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई-३२
४) अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय मुंबई-३२
५) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६) प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय मुंबई-३२
७) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) अप्पर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग,मंत्रालय मुंबई
९) महासंचालक,महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,१३२/ब,भांबुर्डा, भोसलेनगर, पुणे-४११ ००७.
१०) कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जि. रत्नागिरी.
११) कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी,जि. अहमदनगर.
१२) कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी.
१३) कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक,डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला
१४) उपविभागीय कृषि अधिकारी,अहमदनगर/ रत्नागिरी/ परभणी/ अकोला
१५) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
१६) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचलनालय, मंत्रालय, मुंबई-३२
१७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१८) सर्व संबंधित मा.मंत्री/ मा.राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२
१९) कृषि व पदुम विभाग (कार्यासन ८अे/कार्यासन ६अे,) मंत्रालय, मुंबई-३२
२०) निवडनस्ती (कार्या.७ अे)